# सौष्ठव

संपादक : श्रीधर तिळवे सहाय्यक संपादक : मंगेश बनसोड

## या पुरवणीतील साहित्य

* संपादकीय – श्रीधर तिळवे
* विस्साव शिंबोर्स्की हिचे भाषण आणि कविता
मूळ हिंदी अनुवाद : विजय अहलुवालिया
मराठी अनुवाद : मंदार फणसे

## संपादकीय

विष्णू वाघ ह्या आमच्या मित्राने तुका अभंग अभंग ह्या नावाचे तुकारामावर एक नाटक लिहीले. त्याचे गोव्यात कित्येक प्रयोग झाले. कुणी कसलाही आक्षेप घेतला नाही. लोक ह्या नाटकाला दाद देत होते. ह्या नाटकाचा प्रयोग साहित्य संघात मार्चच्या पहिल्या आठवड्यात होणार होता. परवानगी मागण्यासाठी विष्णू वाघ, बाळकृष्ण मराठे हे प्रमोद नवलकरांना भेटले आणि प्रमोद नवलकरांनी तांत्रिक सबब पुढे करून आणि हे तुकारामाचा खून झाला असे दर्शवणारे नाटक आम्ही आमच्या राज्यात येऊ देणार नाही असे ठणकावून ह्या नाटकाला महाराष्ट्रात परवानगी नाकारली.

ह्याचवेळी २८ फेब्रुवारी १९९९ रोजी सदानंद मोरे ह्यांचा महाराष्ट्र टाईम्स ह्या पत्र नव्हे मित्रात विद्रोही तुकारामाच्या खूनाचे मिथक ह्या नावाने एक लेख प्रसिद्ध झाला. वि. भि. कोलते, डॉ. इंद्रभूषण भिंगारे, पांडुरंग कवडे, सुदाम सावरकर ह्यांनी ह्यापूर्वी तुकारामाचे वैकुंठगमन झाले नाही तर त्याचा विरोधक ब्राम्हणांनी खून केला असे प्रतिपादन केले होते. त्याचा आढावा घेऊन अलीकडेच प्रसिद्ध झालेल्या आ. ह. साळुंखे ह्यांच्या विद्रोही तुकाराम ह्या प्रसिध्द पुस्तकातील अशाच प्रकारच्या मताचे मोरे ह्यांनी खंडन केले. दिलीप चित्रे ह्यांनी ५ मार्च १९९९ चा टाईम्स ऑफ इंडियातील Missing for 350 years Retracing the legend of Tukaram ह्या आपल्या लेखात डॉ. सदानंद मोरे ह्यांच्या म्हणण्याचे समर्थन केले. (अर्थात नेहमीप्रमाणेच मोरे हे तुकारामाचे वंशज (डायरेक्ट) आहेत हे सांगायला ते विसरले नाहीत. ह्याचा नेमका तुकारामाशी काय संबंध किंवा वंशज असणे हे तुकारामबाबत बोलण्याचे एक्स्ट्रा क्वालिफिकेशन कसे ठरते हे आजतागायत आम्हाला कळलेले नाही.) मोरेंच्या लिखाणाला निमित्त होते ते निळू फुले ह्या श्रेष्ठ अभिनेत्याने आ.ह. साळुंखे ह्यांच्या पुस्तकावर आधारित चित्रपट काढण्याची घोषणा केली. त्याची विष्णू वाघ ह्यांच्या नाटकाबाबत मात्र ह्यातील कुणालाच वार्ता

नसाची असे दिसते.

२८ मार्च १९९९ रोजी मोरेंच्या टीकेचे खंडन करणारा आ.ह.साळुंके ह्यांचा लेख महाराष्ट्र टाईम्स मधे प्रसिध्द झाला आहे. ह्या लेखावरून महाराष्ट्रात लवकरच तुंबळ वैचारिक वाद होणार हे स्पष्टच दिसते आहे. तुकारामाची हे वर्ष म्हणजे ३५० वी बीज असल्याने तुकारामाविषयी मराठी सांस्कृतिक क्षेत्रात चर्चा होणार अशी आमची अपेक्षा होतीच, त्याप्रमाणे ह्या चर्चेला तोंड फुटले आहे.

तुकारामाच्या चरित्राबाबत अनेक गोष्टी वादग्रस्त आहेत. पहिली त्याची जात कोणती होती? दुसरी तुकारामाच्या गाथा खरोखरच बुडवल्या गेल्या का? जर बुडवल्या गेल्या तर त्या खरोखरच तरंगून वर आल्या का? तिसरी तुकारामाचे सदेह वैकुंठगमनं झाले म्हणजे नेमके काय झाले? की सनातानी ब्राम्हणांनी तुकारामाचा खून करून नंतर त्याचे प्रेत नाहीसे केले व त्याचे सदेह वैकुंठगमन झाले असे सांगितले? चौथी सर्व संताबाबत जी वादग्रस्त आहे ती म्हणजे तुकाराम हा वर्णजातीव्यवस्थेच्या खरोखरच विरोधात होता का? जर तो विरोधात होता तर त्याने अस्पृश्यतेसंदर्भात एकदाही आवाज का उठवला नाही? सध्या ह्यातील फक्त तिसऱ्या मुद्याबाबत चर्चा होत आहे. आमच्या मते ३५० व्या बीजेच्या निमित्ताने ह्या सर्वच गोष्टीबाबत एकदाची झणझणीत चर्चा होणे आवश्यक आहे.

तुकाराम कुणबी होता की वाणी होता हा एक प्रश्न आहे. सध्या वैश्य आणि कुणबी ह्या दोन्ही जाती तुकाराम आमच्याच जातीचा म्हणून सांगतात. तुकाराम स्वत: त्याच्या अभंगात बरे झाले देवा कुणबी केले असे म्हणतो. पण त्याचवेळी आपल्याच अभंगात आपण वाण्याचा व्यवसाय करतो असेही सांगतो. त्याकाळात जातीनिष्ठ व्यवसाय होता हे लक्षात घेता तो वाणीही असू शकतो. त्याची शेती होती. पण वैश्याप्रमाणे तो ती स्वत: न कसता इतरांना कसायला देत असावा असे वाटते. मग तो स्वत:ला कुणबी का म्हणतो? ह्यासाठी आपणाला त्याकाळात जावे लागते. तुकारामाच्या काळात वैश्यांना समुद्रपर्यटन बंदी लागू झाली त्यामुळे त्यांना सामुद्री व्यापार करणे अशक्य झाले त्यामुळे व्यापार मुसलमान व इंग्रजांनी ताब्यात घेतला आणि कलीयुगात वैश्य राहिले नाहीत असे म्हणण्याची पाळी आली. परशुरामाच्या हातून सर्व क्षत्रिय मारले गेल्याने पृथ्वीवर कोणी क्षत्रिय उरलेलाच नाही असे ब्राम्हणांनी आधीच सांगितले होते. परिणामीं सगळे क्षत्रिय शूद्र झाले तर वैश्यांना निव्वळ व्यापार करणे शक्य नसल्याने कुणबी बनून शेती करणे भाग झाले. थोडक्यात तीन उच्चवर्णपैकी क्षत्रिय आणि वैश्य ह्यांचे जातपतन (decasting) होऊन ते शुध्द झाले. ज्ञानेश्वरांच्या वडीलांनाही संन्यास सोडून संसार स्विकारल्याबद्दल बहिष्कृत व्हावे लागले होते. आणि त्यामुळे त्यांच्या मुलांचेही आपोआपच जातपतन झाले होते. तुकारामाचेही हेच झाले. बाह्य व्यापार बुडालाच होता. नंतर अंतर्गतही बुडाला आणि ते सर्वार्थाने कुणबी झाले. म्हणजेच ज्ञानेश्वर आणि तुकाराम हे मराठीतील दोन्ही महाकवी हे जातपतनाचे बळी होते. त्यामुळेच तुकाराम हे वैश्य आणि कुणबी असे दोन्ही होते.

जातपतन झालेल्या ह्या दोघांनी वर्णव्यवस्थविरोधात का सामाजिक लढा उभा केला नाही? हा अलिकडे एक वादाचा मुद्दा झाला आहे. आंबेडकरवाद्यांनी तर संतांच्यावर वारंवार हल्ले चढवले आहेत. अस्पृश्यतेचा साधा निषेध देखील संत साहित्यात आढळत नाही ही वस्तुस्थिती आहे. गाढवाला पाणी पाजणाऱ्या ह्या करुणेला अस्पृश्यांना पाणी का मिळवून द्यावेसे वाटले नाही? हल्ली दिलीप चित्रे आणि सदानंद मोरे वारकरी संप्रदायाचे गोडवे गात दलितांनाही त्याच्याशी नाळ जोडावी असा उपदेश देत फिरत असतात. पण स्पष्टच सांगायचे तर अशी नाळ जोडण्यासाठी संतांनी काहीही केलेले नाही. हे असे का झाले? आध्यात्मिक पातळीवर समता, बंधुता, स्वातंत्र्य सांगणाऱ्यांना सृष्टीय, मानवीय, सामाजिक पातळीवर समता अवतरावी असे का वाटले नाही? ह्या प्रश्नाचे उत्तर हेच आहे की मुळातच ही अपेक्षा चुकीची आहे. सर्वसाधारणपणे ह्या जगाचे १) विश्व २) सृष्टी ३) प्रतिसृष्टी ४) चिन्हसृष्टी असे चार स्तर आहेत. सृष्टीचे १) अमानवी २) मानवी असे दोन स्तर आहेत. तिसरा व चौथा स्तर हे मानवनिर्मित आहेत. ह्या चारी स्तरावरचे ज्ञान हे एकमेकाला पूरक ठरेलच ह्याची कसलीही खात्री नाही. सृष्टीचे नियम शोधून काढणाऱ्या आयझॅक न्यूटनला तत्कालीन ब्रिटीश समाज रचनेतील अन्याय कळतील असे नाही. संताबाबतीत हेच झाले. त्यांन विश्वानुभव म्हणजेच आध्यात्मिक सत्य कळाले पण स्वत:च्या मानवी सृष्टीतील मानवी समाजरचनेतील अन्याय कळलेच नाहीत. त्यांना फक्त आध्यात्मिक विषमता, आध्यात्मिक गुलामगिरी कळाली. आणि त्याविरूध्द त्यांनी बंड केले. ह्या बंडाचे रुपांतर सामाजिक बंडात झाले नाही आणि परिणामी वर्णव्यवस्थेला हादरे बसलेच नाहीत. तुकाराम ह्या संतपरंपरेतीलच होता.

तुकारामाच्या गाथांचे प्रकरण तर गूढच आहे. त्यांना गाथा बुडवाव्या लागल्या हे तुकारामच सांगतात आणि इंद्रायणीने गाथा तारल्या. विठ्ठलाने त्या परत केल्या हे ही तुकारामच सांगतात. विज्ञानाच्या कसोटीवर हे प्रकरण पटणारे नाही. त्यामुळे एकतर हे प्रकरण संपूर्णपणे निकालात काढावे लागते किंवा संपूर्ण स्विकारावे लागते. निकालात काढण्यातली अडचण अशी की खुद्द तुकारामच त्याची कबुली देतात. इतरत्र चमत्काराची खिल्ली उडवणारे तुकाराम स्वत:च हा चमत्कार घडला इतकेच नव्हे तर असा चमत्कार आपण पांडुरंगाला करायला लावून त्रासच दिला ह्याबद्दल

पश्चात्ताप करतात. आ. ह. साळुंखे हे ब्राम्हणांनी गाथा बुडवल्या हा पूर्वार्ध स्विकारतात पण उत्तरार्ध नाकारतात. विज्ञानाच्या कसोटीवर पूर्वार्ध शक्य आहे. उत्तरार्ध अशक्य आहे. शेवटी ही घटना खरी व मानता प्रतिकात्मक मानणेच गरजेचे वाटते म्हणजे असे की गाथा बुडवल्या गेल्या व त्या तुकारामच्या स्मृतीने किंवा इतर कुणीतरी स्मृतीरूपाने वा लेखन रुपात जतन केल्या गेल्या आणि पुन्हा उपलब्ध झाल्या. तुकारामाने ह्यालाच चमत्कार म्हटले असावे आणि ह्यासाठी आपण विठ्ठलाला त्रास दिला म्हणून त्यांच्यासारख्या सेन्सीटीव भक्ताला त्रास झाला असावा. त्यातूनच त्यांचा पश्चात्ताप निर्माण झाला असावा. तो त्यांनी अभंगातून व्यक्त केला असावा.

तुकारामाचे सदेह वैकुंठगमन हेही असेच प्रतिकात्मक पातळीवर समजून घेतले पाहिजे. सुरवातीला अत्यंत अंधश्रद्धाळू भावभोळा भक्त असलेला तुकाराम नंतर नंतर मात्र आहे ऐसा देव वदवावे वाणी नाही ऐसा मनी अनुभवावा असा देव नाकारण्यापर्यंत जातो. ह्याचा अर्थ तो आध्यात्मिकता नाकारत नाही. विश्वानुभव हाच सत्यानुभव आणि तोच विठ्ठलानुभव हे त्याला नंतर समजतं मग विश्व हाच विठ्ठल, विश्व हेच परब्रम्ह हे त्याला उमगते आणि मग विठ्ठल राहणार कुठे वैकुंठात म्हणजे विठ्ठल राहणार कुठे तर विठ्ठलातच कारण सर्वत्र विठ्ठलच आहे. आणि म्हणूनच विठ्ठल = परब्रम्ह = विश्व = वैकुंठ असा हा प्रवास आहे. मोक्ष म्हणजे ह्या विठ्ठलाला विश्वाला परब्रम्हाला वैकुंठाला उपलब्ध होणे आहे. तुकारामाने मोक्ष मिळवला. हा मोक्ष किंवा निर्वाण काहींना देह जिवंत असतानाच प्राप्त होतो म्हणजे देहातल्या देहात निर्वाण प्राप्ती होते. काहींना मात्र देह सोडतांना शेवटच्या क्षणी ही उपलब्धी होते. तुकाराम सदेह वैकुंठाला गेले याचा अर्थ त्यांना त्यांच्या देहातच निर्वाणप्राप्ती किंवा मोक्षप्राप्ती झाली असा होतो. अनेकदा भक्त किंवा साधक इतका उत्कट असतो की त्याला देहसुद्धा अडथळा वाटतो. काहीवेळा भक्ताला निर्वाणप्राप्तीनंतर देहात राहण्याची आशा रहात नाही असे लोक जिवंतपणीच समाधी घेतात. तुकारामांनी आपले कार्य संपल्यानंतर देहाचा एकांतात जाऊन त्याग केला. आ. ह. साळुंख्यांनी तुकारामाने स्वत:च्या 'अहम' 'आत्मा' 'अहंकार' ह्यांच्या मृत्यूचा जो सोहळा वर्णन केला आहे त्यात त्यांच्या खूनाचा वास आणि पुरावा शोधला आहे. इतक्या सुंदर अनुभवात असली भीषण गोष्ट शोधणे फक्त चार्वाकवाद्यांनाच शक्य आहे. तुकाराम आणि चार्वाक ह्यांची सांगड घालण्याचा साळुंख्यानी केलेला प्रयत्न फक्त तुकारामाविषयीच नव्हे तर चार्वाकाविषयीही अज्ञानच प्रकट करतो. मोक्ष हा पुरूषार्थ सर्वांगाने नाकारणारा चार्वाक कुणीकडे आणि मोक्ष हाच एकमेव पुरूषार्थ मानणारा तुकाराम कुणीकडे? ही दोन टोके आहेत. त्यांच्यात सांगड घालण्याचा प्रयत्न हा ब्राम्हणविरोधी लढ्यासाठी आवश्यक वाटत असला तरी अंतिमत: तो कुणाच्याच भल्याचाच नाही. कारण त्यात सत्याचा अपलाप आहे. बुध्द आणि मार्क्स ह्यांना एकत्र आणण्याचा प्रयत्न फसला आहेच. आता तुकाराम आणि चार्वाक ह्यांना एकत्र आणण्याचा प्रयत्न चालला आहे. हाही प्रयत्न फसल्याशिवाय राहणार नाही. आध्यात्मवादाच्या आधारे जडवादी (materialistic) समस्या सोडवणे सहज शक्य आहे. (स्वाध्याय परिवार हे त्याचे उत्तम उदाहरण आहे.) पण जडवादाच्या आधारे आध्यात्मिक समस्या सुटणे शक्य नाही. भारतातील बुद्ध, महावीर, गोखले, रानडे, गांधी, आंबेडकर ह्या सर्व थोर पुरूषांना हे कळले होते. आ. ह. साळुंख्यासारख्या चार्वाकवाद्यांना आणि मार्क्सवाद्यांना ज्या दिवशी हे कळेल तो सुदिन होय. एक गोष्ट इथे हे संपादकीय संपवताना सांगितलीच पाहिजे. आ. ह. साळुंखे यांनी आपल्या लेखात दिलीप चित्रे ह्यांनी त्यांच्या लेखात मला साळुंखे ह्यांच्या तर्काच्या ठिकऱ्या उडवणे आवडेल ह्या अर्थाने केलेल्या प्रतिपादनाला उत्तर देताना 'चित्रे हे कवी आणि तुकारामाच्या काव्याचे अभ्यासक आहेत हे माहित होते. ते तर्कशास्त्रज्ञही असल्याचे आता कळले हे छान झाले! भिडू देत तर्काला तर्क!' असे खवचट उद्गार काढलेत. जणू कवी तर्कशास्त्रज्ञ असत नाहीत असा हा सूर आहे. आमच्या अनुभवानुसार आम्ही इतकेच सांगतो की चित्रे हे भारतीय संस्कृतीचे खोल अभ्यास केलेले अभ्यासक आहेत. ते कवी आहेत म्हणून त्यांच्या अभ्यासाची किंवा तर्कपटूत्वाची कोणीच शंका घेऊ नये. एखादा समीक्षक किंवा कवी दोन्ही क्षेत्रात कार्यरत असला की त्याला त्या त्या क्षेत्रातला अभ्यासक स्वत:च्या क्षेत्रात तो कसा मूर्ख आहे आणि दुसऱ्या क्षेत्रात कसा तो श्रेष्ठ आहे हे सांगत असतो. मग तर्कशास्त्रज्ञ कवीला, कवी समीक्षकाला अनुक्रमे त्यांनी कवितेत किंवा समीक्षेत काम करावे अशा प्रकारचा सूर लावत राहतो. जणू स्वत:च्या क्षेत्रात ह्या लोकांना प्रतिस्पर्धी नको असतो. महाराष्ट्रात ही प्रथा आहे आणि ती अनुचित व संस्कृतिच्या वाढीसाठी धोकादायक आहे. आ. ह. साळुंखे संस्कृतचे अभ्यासक आहेत. कवी आणि तर्कशास्त्रज्ञ कसे एकत्र जातात ह्यासाठी त्यांनी शंकराचार्यांचे पुन्हा वाचन करावे. खरेतर तुकारामातही ते एकत्र जातात. तुकाराम वाचून साळुंख्यांना इतकेही कळले नसेल तर त्यांना तुकाराम काय कळला?

**श्रीधर तिळवे**

**विस्साव शिंबोर्स्की** - १९९६ सालची नोबेल पारितोषीक विजेती पोलिश (पोलंड) कवयित्री. नोबेल पारितोषिक स्विकारताना तिने केलेले भाषण, आणि काही कविता येथे अनुवाद करून देत आहोत. 'मावळत्या शतकात' या कविता संग्रहातून. **मूळ हिंदी अनुवाद - विजय अहलुवालिया, मराठी अनुवाद - मंदार फणसे**

# मी जाणत नाही पण...

असं म्हणतात की भाषणातील सर्वात कठीण पहिलं वाक्य असतं. असो ते तर माझं बोलून झालं पण मला असं वाटतं की इथे त्यानंतरही येणारं प्रत्येक वाक्यं तिसरं, चौथं अगदी शेवटचं सुद्धा तेवढंच कठीण आहे; कारण मला कवितेवर बोलायचं आहे. मी या विषयावर क्वचितच बोलते. जवळजवळ नाहीच. जेव्हा जेव्हा अशी संधी आली तेव्हा मला ते शक्य नाही असंच वाटत आलंय. त्यामुळे माझं भाषण काहीसं छोटं, थोडक्यात असणार आहे.

उणीवांना सहज स्विकारणं, त्या जर अंशा अंशानं समजावून दिल्या तर सहज सोपे जाते. असं दिसून आलयं की आमचे समकालीन कवी स्वत:बाबत खरेतर स्वत:बाबतच अधिक असमंजस आणि संशयी परिस्थितीत रहात असतात. ते आपल्या कवी असण्याला काहीशा संकोचानंच कबूल करतात. जणू कवि असणे ही एक लज्जास्पद गोष्ट आहे असे त्यांना आतल्याआत वाटत असते. या खळबळजनक काळात आपल्या गुणांना स्विकारण्यापेक्षा आपल्या दोषांना स्विकारणं जर त्यांना आपण अधिक आकर्षक बनवून प्रस्तुत केलं तर जास्त सोपं. कारण एकतर आमचे गुण हे आमच्यातच खोलवर गाडले गेले जातात किंवा खुद्द आमचाच विश्वास असत नाही.

अशा परिस्थितीत जेव्हा कवींना एखादी प्रश्नावली भरायची असते किंवा ते एखाद्या अनोळख्या व्यक्तीशी बोलत असतात म्हणजे असे की अशावेळी त्यांना स्वत:विषयी सांगण्यावाचून गत्यंतर नसतं तेव्हा ते लेखनाबरोबरच स्वत:चा (पोटापाण्याचा) व्यवसायही सांगतात. अशावेळी एखाद्या ऑफिसातील अधिकाऱ्यापासून बसमधील प्रवाशांपर्यंत सगळ्यांना आश्चर्याचा धक्का बसतो जेव्हा त्यांना कळतं की ते एका कविबरोबर आहेत.

माझ्या मते तत्वज्ञानी लोकांबाबत ही काहीशी अशीच घटना असते परंतू कवींपेक्षा त्यांची स्थिती जरा बरी असते. कारण निदानपक्षी त्यांना आपल्या नावापुढे लावायला किमान डॉक्टर, प्रोफेसर ऑफ फिलॉसॉफी अशाप्रकारच्या पदव्या असतात. त्यामुळे त्यांच्या सन्मानाचे रक्षण होते. पण कुणी कवितेचा प्राध्यापक असत नाही. कारण कवितेचा प्राध्यापक असणे या गोष्टीचा अर्थच असा होईल की कवितेचे सृजन एक असे काम आहे ज्यासाठी विशेष अभ्यास, नियमित परीक्षा, संदर्भ सूची आणि तळटीपा असणारे शोधप्रबंध आणि शेवटी दीक्षांत समारंभात मिळणारी प्रमाणपत्रे इ. गोष्टींची आवश्यकता असते. यापुढे जाऊन असा निष्कर्ष निघतो की कवी होण्यासाठी सुंदर-सुंदर कवितांनी पानांमागून पाने रंगविणे पुरेसे नाही. पुरेसे आणि महत्त्वाचे आहे ते कागदाचे कपटे ज्यावर तुमच्या नावाची अधिकारी मोहोर लागते.

इथे मला रशियन कवी जोसेफ ब्रॉडस्कीच्या आत्मसन्मानाची आठवण येते आहे. एकदा त्याला अगदी याच कारणावरून आंतरिक हद्दपारीची शिक्षा ठोठावली गेली होती. त्याला परजीवी म्हटलं गेलं कारण त्याच्यापाशी कुठलं सरकारी प्रमाणपत्र नव्हतं जे त्याच्या कवी असण्याच्या अधिकाराला सिद्ध करेल. कित्येक वर्षांपूर्वी मला ब्रॉडस्कीला जेलमध्ये भेटायचं भाग्य लाभलं होतं. मला जाणवलं की मी जितक्या म्हणून कविंना भेटले त्यांच्यात ब्रॉडस्की एकटाच होता ज्याला स्वत:च्या कवि असण्याविषयी गर्व होता. त्याने नि:संकोचपणे एका आव्हानाने भारलेल्या सुरात या शब्दात उच्चार केला होता. हे शक्य होण्याचं कारण मला असं वाटतं की तारुण्यात त्याने सोसलेल्या अपमानांची आणि तिरस्कारांची त्याला आठवण आली असावी. असे काही भाग्यशाली देश आहेत की जिथे मानवी आत्मसन्मानाला पायदळी तुडवलं जात नाही. तेथील कवी छापलं जाणं, ऐकलं जाणं आणि समजून घेणं या सगळ्याची अपेक्षा धरून असतात. पण दैनंदिन निरसता आणि गर्दी ह्यांच्यापासून स्वत:ची वेगळी ओळख ठेवण्याचा प्रयत्न करतात. हेच कवी या शतकाच्या सुरवातीला आपल्या विचित्र व विक्षिप्त वागण्यानी लोकांना धक्का देत असत. पण हे सगळं दिखाऊ होतं. शेवटी असा क्षण येतोच ज्यावेळी हे सगळे अवडंबर आणि झकपकपणा उतरवून, कोऱ्या कागदासमोर असतो; सावकाश, स्वत:तल्या कवीची प्रतिक्षा करत.

महान शास्त्रज्ञ आणि कलाकार यांच्या आयुष्यांवर चित्रपट निघणं हा निव्वळ योगायोग नाहीये. जर दिग्दर्शक जास्त महत्वाकांक्षी असेल तर तो त्या गहन प्रक्रियांचा शोध घेत त्यांना पडद्यावर साकारण्याचा प्रयत्न करतोच. ज्या गहन प्रक्रियांतूनच या अमर कलाकृतींचा आणि महान शोधांचा जन्म झाला होता. शास्त्रज्ञांची साधना पडद्यावर दाखवण्यात थोडेफार यश मिळते. कारण त्यात छोटी मोठी उपकरणे यंत्रे, प्रयोगशाळा दाखवल्या जाऊ शकतात. कारण त्यात छोट्या-मोठ्या उपकरणांसहित

अशी दृश्य रसिक प्रेक्षकांना खिळवून ठेवणारी असतात आणि मग तो क्लायमॅक्सचा क्षण - हजारवेळा अपयश दिलेला तो प्रयोग आता यावेळी यशस्वी होणार? अशा दृश्यांत नाट्य भरलेलं असतं. चित्रकारांच्या बाबतीत चित्रपट भव्य असतात ज्यात एखादं लोकप्रिय पेंटींग हळूहळू आकारताना दाखवलं जाऊ शकतं. पहिल्यांदा पेन्सील स्केच पासून शेवटच्या रंगाच्या फटकाऱ्यापर्यंत. संगीतकारांना घेऊन केलेल्या चित्रपटात, संगीताची रेलचेल असते. संगीतकरांच्या कानात गुंजणाऱ्या मेलडीच्या क्षीण स्वरांचे हळूहळू हळूहळू एका सुरेख सिंफनीत रूपांतर होतं जाते. पण हे सगळं बालीश असतं. ज्यामुळे त्या जादूई, रहस्यपूर्ण स्थितीचा थांग लागत नाही. जिला आपण अंत:प्रेरणा म्हणतो. तरी सुद्धा ह्या चित्रपटांत ऐकण्या पाहण्यासाठी काही असतंच. ह्या बाबतीत कवींची स्थिति खूपच वाईट आहे. त्यांचं कवि-कर्म किंचीत सुद्धा 'फोटोजनिक' नसतं; कॅमेरामध्ये घ्यावं असं त्यात काहीच नसतं. जास्तीत जास्त आपण एखाद्या व्यक्तिला टेबलपाशी बसलेला वा सोफ्यावर लोळत पडलेला छताकडे एकटक पहात अधुनमधून काही ओळी लिहीतांना बेचैन अवस्थेत त्यातील काही ओळी खोडतांना दाखवू शकतो. मग एखादा तास जातो. ज्यात काहीच घडत नाही. अशा गोष्टी कुठला प्रेक्षक पडद्यावर पाहणे पसंत करेल? मी आत्ताच अंत:प्रेरणेचा उल्लेख केला. जेंव्हा जेव्हा या अंत:प्रेरणेबद्दल आमच्या समकालीन कविंना विचारलं गेलंय तेव्हा तेव्हा त्यांनी शंकीत मुद्रेनी, अळमटळम उत्तरं दिली आहेत. असं नाही की त्यांना तो सृजनात्मक आवेग माहितच नव्हता, पण त्या स्थितीला, आवेगाला शब्दरूप करसे द्यावे जो त्यांनाही समजला नव्हता. कधीकधी मलाही असे प्रश्न विचारले गेलेत आणि उत्तर देतांना मीही काहीशी अवघडलेली आहे. ह्या विषयावर माझं उत्तर काहीसं असं आहे.

'अंत:प्रेरणा हा केवळ कवि आणि कलाकार यांचाच विशेषाधिकार नाही. तिला अनुभवणारे असे त्यांच्याशिवायही काही लोक आहेत. आणि यापुढेही असतील. ही माणसं म्हणजे ज्यांनी आपली कामं खूप विचार करून आवडीनी निवडलीत आणि खूप मन लावून, जीव ओतून ते ती करत असतात असे डॉक्टर, शिक्षक अगदी माळीसुद्धा... हजारो प्रकारचे लोक असू शकतात. ज्यांचे काम म्हणजे एक सतत चालणारी विजय-यात्रा असते. अडचणी आणि पराभव त्यांच्या जिज्ञासेपेक्षा कधीच मोठे नसतात. प्रत्येक समस्या या लोकांकडून जशी सोडवली जाते जिच्यातून हजारो नवीन प्रश्न निर्माण होत असतात. अंत:प्रेरणा काहीही का असेना, तिचा जन्म एका निरंतर गुंजणाऱ्या वाक्यानी होतो. 'मी जाणत नाही पण...' पण अशी माणसे खूप कमी आहेत. जास्तीत जास्त माणसं आपलं पोट भरण्यासाठी कामं करतात. ते तसं करतात कारण तसं त्यांना करावं लागतं. त्यांच्या कामांचं, आयुष्याचं स्वरुप ते ठरवत नाहीत तर परिस्थिती ठरवते. असं निरस कंटाळवाणं काम ते करतात आणि ह्या कामाचे मोल इतकेच असते की तसे काम दुसऱ्याकडे असत नाही. जगाचं हे एक भयानक रुप आहे. आणि येत्या शतकात त्यात काही बदल होईल अशी चिन्हं सुद्धा दिसत नाहीत. हेच कारण आहे की अंत:प्रेरणा हा फरक कवी-कलाकारांचा अधिकार नाही हे मी मानित असतांनाच कवी-कलाकार हेच नियतीची प्रिय पात्रं असावीत असं मला वाटतं'

इथे माझ्या श्रोत्यांच्या मनात काही शंका येऊ शकतात. ते असा विचार करू शकतील की घोषणा देणारे, सत्तालोलूप, भाषणबाज, अत्याचारी राजकीय नेते, धर्मोन्मादी हुकूमशहा सुद्धा आपलं काम पूर्ण जीव ओतून करत असतात. त्यांच्या उत्साहाबद्दल आणि कल्पनाशक्तीबद्दल कोण संशय घेऊ शकेल? पण फरक असा की ते 'जाणतात? आणि जे काही, जेवढं काही जाणतात, ते त्यांच्यासाठी पुरेसे असते, आहे, सदासर्वकाळ. आता त्यांना आणखी काही जाणून घ्यायची गरजच उरली नाही कारण असं होऊ शकतं की काहीही नवीन जाणून घेणं त्यांच्या तर्कशक्तीला क्षीण करेल. पण ते ज्ञान जे नवीन प्रश्नांपर्यंत पोहोचवत नाही लवकरच मरण पावतं, त्यात ती उर्जा ताण देण्याची ताकद उरत नाही जी जीवनासाठी आवश्यक आहे. इतिहास साक्षी आहे की काही टोकांच्या घटनांमध्ये ही प्रवृत्ती समाजासाठी घातकच ठरली आहे.

यासाठीच मी एका छोट्याशाच वाक्याला इतकं महत्त्वाचं मानते - 'मी जाणत नाही पण...' आहे अगदी छोटं पण याची भरारी उंच आहे. हे आयुष्याला इतकं विस्तारून टाकतं की यात हे अनंत आकाश सामावून जाईल ज्यात आपली ही छोटीशी धरित्री तरंगत आहे. जर आयझॅक न्यूटननी म्हटलं नसतं की, 'मी जाणत नाही,' तर त्याच्या बागेत सफरचंदाचा पाऊस पडला असता तरी त्याचा काय उपयोग झाला असता? जास्तीत जास्त त्याने काही सफरचंदं उचलून खाल्ली असती. जर माझ्याच देशाच्या मादाम क्युरीनी म्हटलं नसतं की 'मी जाणत नाही' तर काय झालं असतं? सहज शक्य आहे की ती एखाद्या कन्याशाळेत शिकवित - शिकवित, एक चांगलं काम करतेय या संतोषातच आयुष्य घालवून बसली असती. पण तिने हे म्हणायची जिद्द सोडली नाही की, 'मी जाणत नाही पण' आणि हे शब्द तिला एकदा नव्हे दोनदा स्टॉकहोमपर्यंत घेऊन आले. जिथे कधी कधी प्रश्न व्याकुळ संशोधकांना नोबेल पारितोषिकांनं सन्मानित केलं जातं. जर कुणी खरंच कवी असेल तर सतत म्हणत असेल, 'मी जाणत नाही पण...' त्याची प्रत्येक कविता याप्रश्नांचं उत्तर असेल. पण कोऱ्याकागदावर शेवटचे शब्द लिहायच्या आधीच तो पुन्हा विचारात गढून जाईल - की हे एखादं कामचलावू उत्तर तर नाही ना? आरंभापासून अंतापर्यंत अपूर्ण आणि अपूरे.

त्यामुळे तो पुन्हा प्रयत्न करतो. करतच रहातो, कालांतरानी साहित्याचे इतिहासकार त्याच्या अवस्थेला आणि प्रश्न व्याकुळतेला काव्य-सृजन असे गोंडस नाव देतात. मी कधी एक स्वप्नं पहाते जे सत्यात येणं शक्य नाही. मी कल्पना करते की मला एक्लिसिएस्टिसशी बोलायची संधी मिळाली. तोच एक्लिसिएस्टिस ज्याने मनुष्याच्या आकांक्षा आणि उद्यमशिलतेची गाणी गायली. मी त्याच्यापुढे नतमस्तक होईन कारण कमीत कमी माझ्यासाठी तो जगातील महान कवींपैकी एक आहे. मग त्याचा हात पकडून म्हणीन, 'एक्लिसिएस्टिस' तू असं लिहीलयसं की आकाशाच्या खाली जे नेहमी होतं, ते आहे, तेच राहील. नवीन

असं काहीच नसतं पण तू स्वतःच इतका नवीन आहेस आणि तुझ्या कवितासुद्धा नवीन आहेत कारण तुझ्या आधी कुणी त्या लिहील्या नव्हत्या. तुझे वाचक सुद्धा नवीन आहेत. तू ज्या सायप्रस वृक्षाच्या सावलीत बसलायस, तो सुद्धा अनादिकालापासून इथे उभा नाहीये, या आधीसुद्धा असे सायप्रस झालेत पण त्यांच्यापैकी कुणीच 'हा नव्हता?' पुढे मी त्याला हे की विचारू इच्छिते की, प्रिय एक्लिसिएस्टिस, या प्राचीन आकाशाखाली तुझी नवीन रचना कुठली असेल? जो विचार तू व्यक्त केलायंस त्यालाच आणखी पुढे घेऊन जाशील? की त्यातील एखाद्याला बदलू इच्छितोस? तू पूर्वीच्या साहित्यकृतीत सुखांचा उल्लेख केलायस, काय झालं जर ते क्षणिक असले तरी! त्यामुळे असं होऊ शकतं की तुझी पुढची कविता सुखा संदर्भात असेल. काय तिच्यासाठी तू टिपणं काढलीस? पहिला मसुदा तरी तयार आहे? मला नाही वाटत की तू सांगशील की तुझं सगळंच लिहून झालंय. आता सांगण्यासारखं काहीच उरलं नाही म्हणून. विश्वातील कुठलाच कवि असं म्हणू शकत नाही, मग तू तर काव्य-शिरोमणी आहेस!

या विश्वाची महत्ता आणि अनंत पसाऱ्याने आतंकित मानव, प्राणी, वनस्पतींच्या दुखःवेदनांच्या (वनस्पतींना दुखःवेदना नसतात असं मानायचं कारण नाही) उदासीनतेने क्षुब्ध आम्ही याबद्दल जो काही विचार करू, मरणासन्न गृहमालांच्या, ताऱ्यांच्या प्रकाशानी घायाळ या किनारा नसलेल्या विस्ताराबद्दल आम्ही जे काही करू. आम्ही जो काही विचार करू या विशाल रंगभवनाबद्दल ज्याची तिकीटं योगायोगानंच आमच्या हाती लागली आहेत. ही तिकीटं ज्यांचा कालावधी हास्यास्पदरित्या छोटा आहे जो दोन मनमानी तारखांच्यात आकसलेला आहे. आम्ही काहीही विचार केला तरी हे विश्व खरंच अद्भूत आहे. पण 'अद्भूत' हे असं विशेषण आहे ज्यात तार्कीक पेच आहे.

'अद्भूत' म्हणजे अशी गोष्ट की सर्वमान्य आणि सर्वज्ञात प्रतिमानापेक्षा वेगळी असते. एका अशा स्वयंस्पष्टतेपेक्षा वेगळी जिची आपणाला सवय झाली आहे. पण सत्य हे आहे की असं काही 'स्वयंस्पष्ट' काहीच असत नाही. 'अद्भूत' संदर्भात आपलं 'आश्चर्य' असंच सहज आहे. ते इतर कुणाशी केलेल्या तुलनेवर आधारलेलं नाहीये. मानलं की दैनंदिन गप्पागोष्टींत आपण प्रत्येक शब्द विचारविमर्ष करून बोलत नाही. आपण सगळेच 'साधारणतः संसार', 'नेहमीचचं आयुष्य', 'सामान्य परिस्थितीत' अशा जुमल्यांचा वापर करतो. पण कवितेत जिथे प्रत्येक शब्दाला स्वतःचं वजन असतं, सामान्य असं काहीच नसतं, ना पुढला दगड ना कुठली त्यावर तरंगणारी मेघमाला, ना दिवस, ना त्यानंतर येणारी रात्र सुद्धा, ना कुठलंच अस्तित्व मग ते कुणाचंही का असेना.

असं वाटतं की कविंचं कर्म सततच एक विशेष काम ठरलंय.



# विस्साव शिंबोर्स्कीच्या कविता

## अतिरेकी बघतोय...

बारमध्ये ठेवलेला बॉम्ब फुटेल...
आता एक वाजून सोळा मिनिटं झालीत...
अजून अवकाश आहे.
कित्येकजण आत जातील
कित्यक बाहेर येतील...
अतिरेकी रस्ता ओलांडून गेलाय...
धोक्यांच्या सीमांपलीकडून उभा राहून पाहतोय
ते दृश्य एखाद्या फिल्ममधे चालावे तसं
पिवळं ब्लाऊज घातलेली बाई...
आत गेलीय...
काळा चष्मा लावलेला तो माणूस
बाहेर येतोय...
जीन्स घातलेली काही मुलं
गप्पा छाटतायत उभ्या उभ्या
एक वाजून सतरा मिनीटं आणि चार सेकंद झालेत
तो छोटू किस्मतवाला आहे...
स्कूटरवरून निघून गेला...
पण लंबू आत चाललाय...
एक वाजून अठरा मिनीटं
मुलगी गायब झालीय
ती आत गेली का नाही?
बघुया जेव्हा त्यांना बाहेर आणले जाईल.
एक वाजून एकोणीस मिनीटं
कुणीच आत जात नाहीये...
पण मोठा टकल्या बाहेर येतोय
पण थांबा जरा
तो आपल्या खिशात काहीतरी शोधतोय
आणि एक वीसला दहा सेकंद कमी आहेत
तो पुन्हा आत गेलाय...
कदाचित आपले हातमोजे विसरला असावा!
घ्या. झाली एक वाजून वीस मिनीटं
काळ ठप्प झाला आहे
एका असीम शून्यात
आता कुठलाही क्षण अंतीम असू शकतो
नाही आत्ता नाही
हो आणि आत्ता
धडाङ्कन बॉम्ब फुटला.

## नफरत

बघा तर, किती तंदुरुस्त आणि खोलवर आहे
आमच्या शतकाची नफरत
किती सहज चकणाचूर करते
मोठ्यात मोठ्या अडथळ्यांना
किती स्फूर्तीनी झडप घालून
आपल्याला पंजात पकडते
ही इतर भावनांपासून किती वेगळी आहे
एकाच वेळी म्हातारी आणि तरुण सुद्धा.
ही स्वत:च त्या कारणांना जन्म देते
ज्यातून ती पैदा झालीये,
ही कदाचित निद्रिस्त सुद्धा होत असेल
पण कायमची नाही,
निद्राहीन रात्रीसुद्धा हिला थकवू शकत नाहीत
खरंतर आणखी ताजंतवानं करतात

**ही धर्म असो वा तो**
**जो हिला जागवेल**
**ही देश वा इतर जो कुणी**
**जो हिला उठवेल**

न्यायसुद्धा तोपर्यंत योग्य रस्त्याने
चालत राहील जोपर्यंत नफरत तो बदलवत नाही.
तुम्ही पाहिलंत का हिचा चेहरा
कामोन्यादातील विकृत मुद्रांनी ग्रस्त चेहरा
इतर भावना हिच्या समोर किती
कमकुवत आणि मिळमिळीत दिसतात.
काय बंधुभावाच्या जोरावर कुणी
कधी गर्दी जमवलीयें?
काय करूणेनी कधी काम पूर्ण झालयं?
कधी संशय एखाद्या झगड्याचा मूळ झालाय?
ती ताकद फक्त नफरतीतच आहे.
ओह! हीची प्रतिभा!
हीची लगन! हीची मेहनत!
कोण विसरू शकेल ती गीतं
जी ही नी रचली?
ती पानं फक्त हिच्यामुळेच
इतिहासात जोडली गेली
ते मृतदेह ज्यांनी भरून गेलेत
ते आमचे चौक, मैदानं आणि शहरं
मानलंच पाहिजे ही सौंदर्याचे
नवनवे आविष्कार करू शकते.
हीची स्वत:चीच सौंदर्यदृष्टी आहे
आकाशात फुटणाऱ्या
बॉम्बरच्ची लालीमा
कुठल्याही सूर्योदयापेक्षा कमी आहे?
आणि भग्नावशेषांची भव्य करूणा
जिच्यामध्ये एखाद्या फालतू चेष्टेप्रमाणे,
फालतू उभा असलेला विजय-स्तंभ!
नफरत मधे समाविष्ट
न जाणो किती विरोधाभास
स्फोटातील धडाक्यानंतरची
मृत्यूची शांतता
बर्फाळ मैदानावर
सांडलेलं लाल रक्त
एवढ्यानंतरही ही कधीच
दूर जात नाही आपल्या
मूळ स्वरांपासून जसा
रक्तबंबाळ शिकारीवर
तुटून पडलेला जल्लाद
ही नेहमीच नवीन आव्हानांसाठी
तयार असते
भले कधी उशीर झाला असो
पण ती येते निश्चितपणे
लोक म्हणतात नफरत आंधळी असते म्हणून
नफरत आणि आंधळी?
अहो हिच्या जवळ तर आहे
ससाण्याची नजर
जी निर्निमेष बघते
भविष्यातून आरपार
असं जर कोणी पाहू शकत असेल
तर ती फक्त नफरत.

## आपल्या काळातील मुलं

आम्ही आपल्याच काळातील मुलं आहोत
आणि आमचा काळ राजकीय काळ आहे
पूर्ण दिवस आणि पूर्ण रात्र
सगळ्याच गोष्टी
माझे, तुमचे, त्याचे
सारेच राजकीय प्रश्न आहेत
तुम्हाला आवडो न आवडो
तुमच्या वंशाचा भूतकाळ एक
राजकीय भूतकाळ आहे
तुमच्या त्वचेचा रंग राजकीय
तुमच्या दृष्टीचा कोन राजकीय
तुम्ही जे काही म्हणाल त्याचा

एक आणखी ध्वनी असतो
एक आणखी आवाज असतो
तुमच्या शांततेला.
खरंतर तुम्ही काही म्हणा वा शांत बसा
राजकारणापासून वाचू शकणार नाही
जेव्हा तुम्ही एखाद्या जंगलाकडे जाता
तेव्हा सुद्धा तुमची ती एक राजकीय चाल असते
एका राजकीय प्रदेशात
गैर राजकीय कवितासुद्धा
राजकीय आहेत.
आणि आमच्यावर उगवलेला चंद्रसुद्धा
फक्त चंद्र नाहीये,
जगा नाही तर नका जगू
हा एक प्रश्न आहे
जरी यामुळे पचन खराब होतं
तरी सुद्धा नेहमीच
एक राजकीय प्रश्न राहिला आहे
राजकारणाच्या क्षेत्रात येण्यासाठी
जरुरी नाही की तुम्ही माणूस असावं
तुम्ही कच्चा माल, प्रथिनयुक्त आहार,
केरोसीन वा लाकडाचं टेबल
असला तरी
तुमच्यावर महिनोन् महिने
वाद चालू शकतात
अंतहीन वाद
ज्यांत जीवन आणि मृत्यूचे निर्णय
गोल मेजांवर होत की चौकोनी मेजांवर
आणि ह्यातच लोक दम तोडतात
चौपाया मरत असतात
घरंगळत असतात
पिकं नष्ट होत असतात
सगळं होत असतं अगदी तसंच
जसं त्या काळात होत असे
जेव्हा काळाचे रंग
इतके राजकीय नव्हते.

## डायनॉसोरचा अस्थिपंजर

मित्र हो,
तुमच्यासमोर सादर करीत आहोत
बेढब आकृतीचा एक सुंदर नमुना
बघा, वर लटकलेला

डायनॉसोरचा अस्थिपंजर
दोस्त हो,
डावीकडे निरसीम आकाशात पसरलेली
त्याची शेपटी आहे आणि
दुसऱ्या दिशेस चाललीये त्याची मान
साथिदारांनो,
चिखलात रुतलेल्या याच्या चार टांगांमध्ये
पहाडासारख्या त्याच्या धडाखाली
बंधुंनो आणि भगिनींनो,
खरचं आहे की निसर्ग कधी चुकत नाही
पण त्याच्या ही आपल्या काही चेष्टा असतात
हसूच येतं, याचं छोटसं डोकं पाहून
प्रिय प्रेक्षकांनो,
डोकं इतकं छोटालं की त्यात
उद्याविषयी विचार करण्यासाठी काही जागाच नव्हती
परिणाम - त्या महाकाय जातीचा विनाश!
आदरणीय विद्वानांनो,
एवढी छोटीशी बुद्धी
त्यावर एवढी मोठी भूक
भविष्याच्या चिंतेपेक्षा जास्त
मतिहीन निद्रा
सभ्य स्त्री-पुरूष हो,
या बाबतीत आपली अवस्था
खूप चांगली आहे
आयुष्य मजेत आणि
हे जग आपलंच आहे
व्यासपीठावरील मान्यवरांनो,
ताऱ्यांनी भरलेल्या आकाशाखाली
एक सुबुद्ध जमात
जिच्यात वाढतायत
नैतिकतेचे उदात्त आदर्श
महोदय,
असा चमत्कार नेहमी नेहमी होत नाही
आणि तो सुद्धा एकाच ताऱ्याच्या खाली!
उपस्थित श्रोत्यांनो,
किती कुशल आहेत आमचे हात
किती वाचाळ आहेत आमचे ओठ
आणि आमच्या खांद्यावर जुळलेलं
हे अनुपम डोकं
मान्यवरांनो,
झडलेल्या शेपटीच्या बदल्यात
इतकी मोठी जबाबदारी !